**सामुहिक प्रोत्साहन योजना-२००७**
**पूर्व परवानगी न घेता पात्रता व कार्यकालावधीत घटकाने घटनेत बदल केल्यास आकारावयाचा दंड**

महाराष्ट्र शासन
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्र. साप्रोयो-२११०/प्र.क्र. २४०/उद्योग-८
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - १८ जून, २०११.

वाचा- १) शासन निर्णय उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्र. आयडीएल-७०७९/प्र.क्र. ९५२२७/२५४०/उद्योग-८, दि. ११/८/१९८०.
२) राज्यस्तरीय सल्लागार समितीच्या दि. १/१०/२०१० रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**शासन निर्णय-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ , दि. ११/८/१९८० नुसार सामुहिक प्रोत्साहन योजनेची कार्यनियमावली घोषित करण्यात आलेली आहे. सदरच्या कार्यनियमावलीतील परिच्छेद ११.२२ नुसार, सामुहिक प्रोत्साहन योजनेअंतर्गत प्रोत्साहने उपभोगलेल्या उद्योग घटकास, त्याच्या कार्यकालावधीत अभिकरण संस्थेच्या पूर्वपरवानगीशिवाय, उद्योग घटकाच्या घटनेत बदल करता येणार नाहीत, अशी तरतूद करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे परिच्छेद ११.२३, ११.२४ व ११.२५ नुसार अभिकरण संस्थेच्या पूर्वपरवानगीशिवाय घटकाच्या कार्यकालावधीत घटनेत बदल केल्यास दंडात्मक तरतूदी करण्यात आल्या आहेत.

२. वर नमूद केलेल्या दंडात्मक तरतूदी शिथिल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीत होती. त्यानुसार राज्यस्तरीय सल्लागार समितीच्या दि. १/१०/२०१० रोजी झालेल्या बैठकीत वरील परिच्छेद ११.२३ व ११.२४ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

" पूवपरवानगी न घेता पात्रता व कार्यकालावधीत उद्योग घटकाने घटनेत बदल केल्यास घटकाच्या एकूण पात्र स्थिर गुंतवणूकीच्या ०.१ टक्के अथवा जास्तीत जास्त रु. ५०,०००/- (रुपये पन्नास हजार ) तसेच द्वितीय व त्यापुढील बदलास एकूण पात्र व स्थिर गुंतवणूकीच्या ०.१ टक्के अथवा जास्तीत जास्त रु. १,००,०००/- (रुपये एक लाख ) दंड आकारण्यात यावा. सदर नियम दि. १/१०/२०१० नंतर घटनेतील बदलासाठी मंजूरी दिलेल्या घटकांनाच लागू राहील."

राज्य स्तरीय समितीच्या वरील निर्णयास शासन मान्यता देत आहे.

३. हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक 20110618105516001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( दा.अं. कुलकर्णी )
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय,मुंबई.
२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई.